GR-200402051713224001-0100

**मंत्री आस्थापनेवरील उसनवार तत्वाने (लोन बेसीस) कार्यरत असणा-या अधिकारी/कर्मचा-यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागास/कार्यालयास परत करण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांकः एमआयएन-२००१/प्र.क्र.१२२/२१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांकः २३ ऑगस्ट २००१.

**परिपत्रकः-**

मंत्री/ राज्यमंत्री आस्थापनेवर अनुज्ञेय/ कर्मचारी आकृतीबंधानुसारच अधिकारी/कर्मचारी यांची नियुक्ती करणे आवश्यक आहे. यासंदर्भात शासनाच्या असे निदर्शनास आले की, मंत्री/ राज्यमंत्री यांच्या आस्थापनेवर उसनवार तत्वाने (लोन बेसीस) बरेच अधिकारी/ कर्मचारी कार्यरत आहेत. त्यामुळे त्यांच्या मूळ विभागातील कार्यालयाच्या कामकाजावर विपरित परिणाम होतो. म्हणून शासनाने असा निर्णय घेतला आहे की, सदर अधिकारी/ कर्मचा-यांना त्यांच्या मूळ विभागात/ कार्यालयात परत करण्यात यावे. यास्तव आपल्या आस्थापनेवर कार्यरत असलेल्या उसनवार तत्वावरील कर्मचा-यांच्या सेवा तात्काळ त्यांच्या मूळ विभागास परत करण्यात याव्यात व त्याची माहिती या विभागास कळवावी. तसेच सदरील अधिकारी/कर्मचारी यांना उपलब्ध करुन दिलेली ओळखपत्रे या विभागात तात्काळ जमा करण्यात यावीत. सदरील अधिकारी/कर्मचारी यांना जर मूळ विभागात/ कार्यालयात परत पाठविले नाही तर त्यांचे वेतन व भत्ते त्यांच्या संबंधित विभागांनी आहरीत करु नये. तसेच आकृतीबंधानुसार आपल्या आस्थापनेवर जी पदे रिक्त असतील ती ही तात्काळ भरण्यात यावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

म.चि.पाटील
(म.चि.पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) सह सचिव(आस्थापना), मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२) उप सचिव, उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) सर्व मंत्रालयीन विभाग,

... त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील मंत्री/राज्यमंत्री यांच्या आस्थापनेवरील उसनवार तत्वाने उपलब्ध करुन दिलेल्या कर्मचा-यांच्या सेवा आपआपल्या विभागात परत घ्याव्यात.

५) निवड नस्ती.